२०१०१२२७१५०९५६००१

***सामाजिक वनीकरण विभागातील आकृतीबंध बाहय सामाजिक वनीकरण मजूरांच्या पदांना मुदतवाढ देणेबाबत..***

**महाराष्ट्र शासन**
ग्राम विकास व जलसंधारण विभाग
शासन निर्णय क्रमांक : आस्था-२०१०/प्र.क्र.१७९/जल-१३
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २७ डिसेंबर, २०१०.

**वाचा :-**

१. शासन निर्णय वित्त विभाग क्र. असक १००४/प्रक्र.१२/(भाग२)/२००४/विसू-१ दिनांक ४.१०.२००४.

२. शासन निर्णय, ग्रा.वि.व.ज.सं.वि., क्र. आस्था २००६/प्रक्र.१५९(१)/जल-१३, दिनांक २९.१२.२००७.

३. शासन निर्णय, ग्रा.वि.व.ज.सं.वि., क्र. आस्था २००६/प्रक्र.१५९(२)/जल-१३, दिनांक २९.१२.२००७

४. शासन निर्णय, ग्रा.वि.व.ज.सं.वि., क्र. आस्था २००८/प्रक्र.९/जल-१३, दिनांक ५.२.२००८.

५. शासन निर्णय, ग्रा.वि.व.ज.सं.वि., क्र. आस्था २००८/प्रक्र.९/जल-१३, दिनांक २६.३.२००८.

६. शासन निर्णय, ग्रा.वि.व.ज.सं.वि., क्र. आस्था-२००८/प्रक्र.७३/जल-१३, दिनांक ७.१..२००९.

७. शासन निर्णय, ग्रा.वि.व.ज.सं.वि., क्र. आस्था-२००९/प्रक्र.५३/जल-१३, दिनांक १.४.२००९.

८. शासन निर्णय, ग्रा.वि.व.ज.सं.वि., क्र. आस्था-२०१०/प्रक्र.२१८/जल-१३, दिनांक १७.१२.२००९.

९.संचालक, सामाजिक वनीकरण, संचालनालय,महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्रमांक- कक्ष -४ /आस्था/चाबाप्र/४३/१०-११ /२०५३ सन १०-११, दि.५.१०.२०१० चे पत्र.

**प्रस्तावना :-** वित्त विभागाने निर्धारित केल्याप्रमाणे सामाजिक वनीकरण विभागातर्गत कार्यरत असलेल्या सामाजिक वनीकरण संचालनालयाच्या नियंत्रणाखालील योजनेतर व योजनांतर्गत संवर्गातील पदांचा आकृतीबंध संदर्भ क्र. २ नुसार निश्चित करण्यात आला असून त्यानुसार २४८१ पदांना मान्यता देण्यात आली आहे. आकृत्तीबंध निश्चित करण्यापूर्वी सामाजिक वनीकरण संचालनालयाच्या आस्थापनेवर सामाजिक वनीकरण मजूर यासंवर्गात १०३८ पदे कार्यरत होती. त्यापैकी ५४२ पदांचा समावेश आकृतीबंधात केला आहे. उर्वरित पदांना (आकृतीबंध बाहय) अधिसंख्य पदे म्हणून वित्त विभागाने मान्यता दिली आहे. सदर पदांना संदर्भाधीन क्र.३ ते ८ येथील शासन निर्णयान्वये वेळोवेळी मुदतबाढ देण्यात आली आहे. त्यानुसार शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक आस्था-२००९ /प्र.क्र.२१८ /जल-१३ दिनांक १७.१२.२००९ अन्वये दिलेली मुदतवाढ (दिनांक ३१.१०.२०१० पर्यत) समाप्त झाली असल्याने संचालक, सामाजिक वनीकरण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्रमांक -कक्ष-४/आस्था/चाबाप्र/४३/१०-११/२०५३/सन-१०-११ दिनांक ५.१०.२०१० चे पत्रान्वये प्राप्त झालेल्या प्रस्तावानूसार पुढील मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचारधीन आहे.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त संदर्भाधीन क्र.६ येथील शासन निर्णय दिनांक ७.१.२००९ अन्वये सामाजिक वनीकरण मजूर संवर्गातील ४८२ अधिसंख्य पदांना दिनांक १.१२.२००८ ते दिनांक ३१.१०.२००९ या कालावधीसाठी मुदतवाढ देताना, मुदतवाढ दिलेली अधिसंख्य पदे, निवृत्ती अथवा अन्य कोणत्याही कारणामुळे रिक्त झाली असल्यास सदर पदे आपोआपच व्यपगत होतील, या अटीच्या अधिन राहून मान्यता दिली होती. संचालक, सामाजिक वनीकरण संचालनालय, महाराष्ट्र राज्य पुणे यांनी त्यांच्या दिनांक ५.१०.२०१० च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावान्वये उपरोक्त अटीनुसार रिक्त झालेली पदे विचारात घेवून उर्वरित ४०६ पदांना पुढील ११ महिन्याच्या कालावधीसाठी मुदतवाढ देण्याचे प्रस्तावित केले आहे. त्यानुसार प्रस्ताव वित्त विभागाच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता त्यास अनुलक्षून वित्त विभागानी सदरहू पदांना दिनांक ३१.३.२०११ पर्यत मुदतवाढ देण्यास मान्यता देताना, दोन वर्षे झाली असल्याने सदरहू पदांचा समावेश आढाव्यात घेणे आवश्यक असल्याचे नमूद केले आहे. त्यानुसार विभागाने सदरहू पदांचा समावेश आढाव्यातील पदामध्ये घेण्याची कार्यवाही करावी असे सूचित केले आहे. त्यानुसार सामाजिक वनीकरण वृत्तांतर्गत एकूण ४०६ सामाजिक वनीकरण मजूरांच्या अधिसंख्य पदांना दिनांक १.११.२०१० ते दिनांक ३१.३.२०११ पर्यत एकूण ०५ महिन्याच्या कालावधीकरीता खालील अटीच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यात येत आहे:-

अ) वित्त विभाग, क्र.विविक्षी-१०९७/प्र.क्र.२६/९७/अर्थसंकल्प-१९, दि.२०.१२.१९९७ नुसार अस्थायी पदांना मुदतवाढ देताना कर्मचारीवृंदाच्या मानकाचे पुनर्विलोकन योजना / कार्यक्रम यांचा आढावा घेण्यात यावा.

ब) जी पदे ठराविक कालावधीसाठी मंजूर करण्यात आली आहेत, अशी पदे ठराविक कालावधी संपल्यानंतर निरसित करण्यात यावीत.

क) जी पदे नियमानुकूल आहेत अशाच पदांना मुदतवाढ देण्यात येत आहे.

ड) अधिसंख्य पदे निवृत्ती अथवा अन्य कोणत्याही कारणामुळे रिक्त झाली असल्यास सदर पदे आपोआपच व्यपगत होत असल्याने अशा पदांना सदर पदे रिक्त झाल्याच्या दिनांकापासून मुदतवाढ लागू होणार नाही.

इ) प्रपत्र क्र.१ मधील पदांसाठी वेतनावरील येणारा खर्च सन-२०१०-२०११ या वर्षासाठी मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

२. सदर पदासाठी येणारा खर्च मागणी क्रमांक मुख्यलेखाशिर्ष एल-३, २४०६ वनीकरण व वन्यजीव (योजनेत्तर) उपशिर्ष ०१ वनीकरण १०२ सामाजिक व क्षेत्र वनीकरण १०२ ( दोन ) सामाजिक वनीकरणातंर्गत नियमित आस्थापनेवर रोजंदारी काम करणारा कर्मचारी वर्ग (२४०६ १९०४)या लेखाशिर्षातून भागविण्यात यावा.

३.	सदर आदेश हे वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ३१४/१०/व्यय-१५, दिनांक २.११.२०१० नुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतीक स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक क्रमांक 201012271509156001 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

(विजय पाटील )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
संचालक, सामाजिक वनीकरण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
**प्रतिलिपी-**
सर्व सहसंचालक, सामाजिक वनीकरण वृत्त,
सर्व उपसंचालक, सामाजिक वनीकरण विभाग,
महालेखापाल, (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर,
सर्व कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
वित्त विभाग, कार्यासन क्र.व्यय-१५, अर्थसंकल्प-१९ व वित्तीय सुधारणा,मंत्रालय, मुंबई-३२
ग्राम विकास व जलसंधारण विभाग, कार्यासन क्र.जल-११, जल-१२, व कार्यासन-वित्त-१,(ग्रा.वि.)
निवडनस्ती / ग्राम विकास व जलसंधारण विभाग/जल-१३.

Cr 179 Majur

शासन निर्णय, ग्रामविकास व जलसंधारण विभाग,
क्रमांक आस्था-२००९ /प्र.क्र.२१८/जल-१३
दिनांक १७, डिसेंबर, चे सहपत्र (योजनेत्तर कर्मचारी वृंद )

**प्रपत्र-१**

**अधिसंख्य पदांचे विवरण**

| अ.नु. | पदनाम | पद संख्या | मुख्यलेखाशिर्ष | योजना/ उपशिर्ष |
|---|---|---|---|---|
| १ | सामाजिक वनीकरण मंजूर | ४०६ | मागणी क्र.एल-३ २४०६ वनीकरण व वन्यजीव (योजनेत्तर) | ०१ वनीकरण १०२ सामाजिक व क्षेत्र वनीकरण१०२ (दोन ) सामाजिक वनीकरणांतर्गत नियमित आस्थापनेवर रोजंदारी काम करणारा कर्मचारी वर्ग (२४००६ १९०४) |

Cr 179 Majur